महाराष्ट्र आरोग्य सेवा ( वैद्यकीय देखभाल) नियम १९६१ व त्या अनुषंगाने शासकीय कर्मचारी व त्यांच्या कुटुंबियांवरील औषधोपचारावरील खर्चाची प्रतिपूर्ती.. शासन मान्य खाजगी रुग्णालयाच्या नामबदलास मंजूरी देण्याबाबत..ऋषीकेश हॉस्पिटल, नाशिक.

**महाराष्ट्र शासन**
**सार्वजनिक आरोग्य विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः मान्यता-२०१४/प्र.क्र.२९३ /१४/राकावि-२**
जी.टी.रूग्णालय आवार, संकूल इमारत, १० वा मजला,
बी-विंग, मंत्रालय, मुंबई- ४०० ००१.
तारीख: १० नोव्हेंबर, २०१४.

वाचा :-

१) **शासन निर्णय, सार्वजनिक आरोग्य विभाग क्र.एमएजी-२००५/३०९/ प्र.क्र.१२८/आरोग्य-३ दिनांक १ जून,२००६.**
२) **शासन निर्णय, सार्वजनिक आरोग्य विभाग क्र.एमएजी-२००८/प्र.क्र.३३/आरोग्य-५, दिनांक ११ ऑगस्ट,२००९.**
३) **शासन निर्णय, सार्वजनिक आरोग्य विभाग क्र.वैखप्र-२०११/प्र.क्र.३३३/११राकावि-२, दिनांक १६ नोव्हेंबर,२०११.**
४) **शासन निर्णय, सार्वजनिक आरोग्य विभाग क्र.वैखप्र-२०१३/प्र.क्र.२९१/१३/राकावि-२, दिनांक ११ ऑक्टोबर,२०१३.**
५) **संचालक,आरोग्य सेवा, मुबई यांचे पत्र क्र.संआसे/ऋषीकेश हॉस्पिटल / नावात बदल/ टे-१/ कक्ष- ३/१४,दिनांक २जुलै,२०१४.**

प्रस्तावना :-

महाराष्ट्र राज्य सेवा (वैद्यकीय देखभाल) नियम १९६१ व त्या अनुषंगाने वेळोवेळी विहीत केलेल्या नियमांनुसार " ऋषीकेश मेडिकल फौंडेशन आणि रिसर्च सेंटर श्री. समर्थ सुपर स्पेशालिटी हॉस्पिटल, नाशिक" या रुग्णालयास राज्य शासकीय कर्मचारी व त्यांच्या कुटुंबियांना१) मुत्रपिंड प्रतिरोपण शस्त्रक्रिया, उपचार व डायालिसीस २) रक्ताचा कर्करोग व इतर सर्व प्रकारचे कर्करोग ३) ऑर्थोपेडिक शस्त्रक्रिया व उपचार ४) मणक्याचे विकार, खुब्याचे विकार, वेदनायुक्त सांध्यांचे विकार व ते बदलण्याची शस्त्रक्रिया, दुर्बिणीद्वारे गुडघ्याच्या विकाराचे निदान व उपचार ५) मेंदूवरील शस्त्रक्रिया व उपचार ६) कॉम्प्युटराईज्ड रेस्टींग इलेक्ट्रोकार्डिओग्राम, कॉम्प्युटराईज्ड ट्रेडमील स्ट्रेस टेस्ट, व्हेक्टीरोकार डायग्राम, कलर डॉपलर इको कार्डीओग्राम, परमनन्ट पेसमेकर ॲनालायसेस ॲम्बुलेटरी

व्होल्टर मॉनिटरींग या आजार व विशिष्टोपचारांच्या बाबतीत उपचार व शस्त्रक्रिया करण्याकरीता व त्याप्रित्यर्थ होणा-या वैद्यकीय खर्च प्रतिपूर्ती अनुज्ञेय ठरविण्यास वर अनुक्रमांक (१)व (२)येथील दिनांक १ जून,२००६ व ११ ऑगस्ट,२००९ च्या शासन निर्णयांन्वये मान्यता देण्यात आली असून वरील अनुक्रमांक (३) व (४) येथील शासन निर्णयासोबतच्या यादीतही संबंधीत आजारांसाठी सदर हॉस्पिटलचे शासन मान्य खाजगी रूग्णालय म्हणून नाव अंतर्भूत आहे. "ऋषीकेश मेडिकल फौंडेशन आणि रिसर्च सेंटर श्री. समर्थ सुपर स्पेशालिटी हॉस्पिटल, नाशिक" या हॉस्पिटलचे संचालक बदलले असून गेल्यावर्षापासून सदर हॉस्पिटलचे "ऋषीकेश हॉस्पिटल ( न्यु ऋषीकेश मेडिकल फौंडेशन आणि रिसर्च सेंटर प्रायव्हेट लिमिटेड)" असे नामांतर झाले आहे, तेव्हा त्यानुसार सदर नवीन नावास मंजूरी देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय:-**

वर नमूद करण्यात आल्याप्रमाणे शासन निर्णयानुसार राज्य शासकीय कर्मचारी व त्यांच्या कुटुंबियांच्या बाबतीत १) मुत्रपिंड प्रतिरोपण शस्त्रक्रिया, उपचार व डायालिसीस २) रक्ताचा कर्करोग व इतर सर्व प्रकारचे कर्करोग ३) ऑर्थोपेडिक शस्त्रक्रिया व उपचार ४) मणक्याचे विकार, खुब्याचे विकार, वेदनायुक्त सांध्यांचे विकार व ते बदलण्याची शस्त्रक्रिया, दुर्बिणीद्वारे गुडघ्याच्या विकाराचे निदान व उपचार ५) मेंदूवरील शस्त्रक्रिया व उपचार ६) कॉम्प्युटराईज्ड रेस्टींग इलेक्ट्रोकार्डिओग्राम, कॉम्प्युटराईज्ड ट्रेडमील स्ट्रेस टेस्ट, व्हेक्टीरोकार डायग्राम, कलर डॉपलर इको कार्डीओग्राम, परमनन्ट पेसमेकर ॲनालायसेस ॲम्बुलेटरी व्होल्टर मॉनिटरींग या आजार व विशिष्टोपचारां संदर्भात "ऋषीकेश मेडिकल फौंडेशन आणि रिसर्च सेंटर श्री. समर्थ सुपर स्पेशालिटी हॉस्पिटल, नाशिक" या रूग्णालयास शासन मान्यता देण्यात आलेली असल्यामुळे सदर रूग्णालयाचे नाव बदलल्यानंतर सदर रूग्णालयाच्या "ऋषीकेश हॉस्पिटल ( न्यु ऋषीकेश मेडिकल फौंडेशन आणि रिसर्च सेंटर प्रायव्हेट लिमिटेड)" या नवीन नावास याद्वारे शासनाची मान्यता देण्यात येत आहे.

२. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१४१११०१७२६३४०३१७ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Padwal Sunil D

Digitally signed by Padwal Sunil D
DN: c=IN, o=Govt Of Maharashtra, ou=Public Health Dept, postalCode=400001, st=Maharashtra, cn=Padwal Sunil D
Date: 2014.11.11 00:47:51 +05'30'

**(सु.द. पडवळ)**
**महाराष्ट्र शासनाचे अवर सचिव.**

प्रत,

१. मुख्य सचिव, सामान्य प्रशासन विभाग, मंत्रालय, मुंबई.
२. महासंचालक व पोलीस महानिरीक्षक, महाराष्ट्र राज्य, मुंबई.
३. अपर मुख्य सचिव /प्रधान सचिव/ सचिव (सर्व मंत्रालयीन विभाग), मंत्रालय, मुंबई.
४. सचिव, महाराष्ट्र लोकसेवा आयोग, मुंबई .
५. सचिव, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, विधानभवन, मुंबई .
६. विभागीय आयुक्त (सर्व)
७. पोलीस आयुक्त / पोलीस अधिक्षक (ग्रामीण) - (सर्व)
८. मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद (सर्व)
९. महालेखापाल, महाराष्ट्र-१ (लेखा व अनुज्ञेयता)/(लेखा परीक्षा), मुंबई.
१०.महालेखापाल, महाराष्ट्र-२(लेखा व अनुज्ञेयता)/(लेखा परीक्षा), नागपूर.
११. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई.
१२. जिल्हा कोषागार अधिकारी (सर्व)
१३. संचालक, आरोग्य सेवा संचालनालय, मुंबई.
१४. संचालक, वैद्यकीय शिक्षण व संशोधन, मुंबई.
१५. संचालक, आयुर्वेद, मुंबई.
१६. संचालक, राज्य कामगार विमा योजना, मुंबई.
१७. व्यवस्थापकीय संचालक, हाफकीन बायो-फार्मास्युटीकल कॉर्पोरेशन, परेल, मुंबई.
१८. महासंचालक, माहिती व जनसंपर्क विभाग, मंत्रालय, मुंबई.
१९. उपसंचालक, आरोग्य सेवा (सर्व)
२०. जिल्हा आरोग्य अधिकारी, जिल्हा परिषद (सर्व)
२१. जिल्हा शल्य चिकित्सक (सर्व)
२२. महाप्रबंधक, मुंबई उच्च न्यायालय, मुंबई.
२३. प्रोथोनोटरी व सिनियर मास्टर, उच्च न्यायालय, मुंबई.
२४. व्यवस्थापक, शासकीय मध्यवर्ती मुद्रणालय, मुंबई.
२५. सर्व मंत्रालयीन विभाग (आस्थापना), मंत्रालय, मुंबई यांना विनंती करण्यात येते की, त्यांनी सदर शासन निर्णय त्यांच्या अधिपत्याखालील सर्व विभागप्रमुख व कार्यालयप्रमुख यांच्या निदर्शनास आणून द्यावा.
२६. डॉ. बी.एस.मोरे, ऋषीकेश हॉस्पिटल ( न्यु ऋषीकेश मेडिकल फौंडेशन आणि रिसर्च सेंटर प्रायव्हेट लिमिटेड) गंगापूर रोड, नाशिक-४२२००२.
२७. निवड नस्ती (राकावि-२)